**प्रकल्पाच्या बंदी दिनांकापुर्वी मयत झालेल्या भूधारकांच्या वारसांना पुनर्वसनाचे लाभ देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (म. व पु.)**
**शासन परीपत्रक क्रमांकः-आरपीए/२०२४/प्र.क्र.७५/र-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- २ जून, २०२५

<u>वाचा:-</u> महाराष्ट्र प्रकल्पबाधीत व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम ,१९९९

<u>प्रस्तावना:-</u>

महाराष्ट्र जमिन महसूल अधिनियम १९६६, च्या कलम १४८/१४९/१५० मधील तरतुदीनुसार पाटबंधारे प्रकल्पाच्या बाधीत परिमंडलातील ज्या जमिनींची भुसंपादन अधिनियम १८९४, कलम ४ अन्वये अधिसूचना प्रसिध्द करण्याच्या दिनांकापूर्वी (प्रकल्पाच्या बंदी दिनांकापूर्वी) मयत झालेल्या मुळ भूधारकांच्या वारसांची नोंद ७/१२ अधिकार अभिलेखात विलंबाने नोंदविल्यामुळे, अशा मूळ मयत भूधारकांच्या वारसांना एकच युनिट म्हणून ग्राह्य धरुन पुनर्वसनाचे एकत्रित लाभ देण्यात येतात. पाटबंधारे प्रकल्पाच्या बाधित परिमंडलातील जमिनींचे मूळ भूधारक हे भूसंपादन अधिनियम १८९४ च्या कलम ४ अन्वये प्राथमिक अधिसूचना प्रसिध्द होण्याच्या दिनांकापूर्वी मयत झाल्यास, अशा मुळ भूधारकांच्या सर्व वारसांना वारसाहक्क कायद्यानुसार संपादीत जमिनीमध्ये वर्ग १ संवर्गातील वारस या नात्याने स्वतंत्र हिस्सा/स्वतंत्र हक्क प्राप्त होतो. अशा वारसांना पुनर्वसन विषयक लाभ प्रदान करतांना त्यांना एक युनिट म्हणुन ग्राह्य धरावे किंवा स्वतंत्र खातेदार म्हणुन लाभ देण्यात यावेत, याबाबत एकरुपता व सुस्पष्टता आणण्याकरीता अनुसरावयाची कार्यपध्दती विहीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक:-**

१. हिंदु वारसा हक्क (सुधारणा) अधिनियम २००५ मधील कलम ६ व पुनर्वसन अधिनियम कलम २(२)(अ) व त्याखालील परंतुक यांचा विधीविषयक अर्थान्वये एकत्रीतपणे विचारात घेतला असता बंदी दिनांकाच्या ऐवजी संपादीत जमिनीच्या निवाड्याचा दिनांक विचारात घेणे संयुक्तीक आहे. त्यानुसार दिनांक २०.१२.२००४ पुर्वी व दिनांक २०.१२.२००४ नंतर संपादीत जमिनीचा निवाडा पारीत झाला असेल व मुळ भुधारक हा निवाडा पारीत होण्याच्या दिनांकापुर्वी अथवा नंतर मयत झाला असल्यास उद्भवणाऱ्या दोन भिन्न परिस्थितीच्या अनुषंगाने मुळ भुधारकांच्या वारसांना पुढीलप्रमाणे पुनर्वसन विषयक लाभ देण्याकरीता खालील कार्यपध्दती अनुसरण्यात यावी.

अ)	जर संपादीत जमिनीचा भूसंपादन निवाडा २० डिसेंबर २००४ पूर्वी पारीत केला असेल आणि संपादित केलेल्या जमिनीच्या मालकाचा मृत्यू निवाड्याच्या दिनांकापूर्वी झाला असेल, अशा प्रकरणी, मयत जमीन मालकाचा प्रत्येक मुलगा (स्वतंत्र घटक म्हणून) महाराष्ट्र प्रकल्पग्रस्त व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम, १९९९ अंतर्गत प्रकल्पग्रस्त व्यक्ती म्हणून गणला जाईल. मयत जमीन मालकाचा कोणताही मुलगा मयत झाला असेल आणि अशा मुलाचा मुलगा किंवा मुलगे (सर्व मिळून एक घटक म्हणून) असतील, तर त्यांना प्रकल्पग्रस्त व्यक्ती म्हणून गणले जातील.

ब)	जर संपादीत जमिनीचा भूसंपादन निवाडा २० डिसेंबर २००४ नंतर पारीत केला असेल आणि संपादित केलेल्या जमिनीच्या मालकाचा मृत्यू अशा निवाड्याच्या दिनांकापुर्वी झाला असेल, अशा प्रकरणी, मयत जमीन मालकाचा प्रत्येक मुलगा तसेच प्रत्येक मुलगी महाराष्ट्र प्रकल्पग्रस्त व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम, १९९९ अंतर्गत स्वतंत्र घटक म्हणून प्रकल्पग्रस्त व्यक्ती म्हणून गणले जातील. मयत जमीन मालकाचा कोणताही मुलगा किंवा मुलगी मृत्यू पावला असेल आणि अशा मुलाचा/ मुलगीच्या मागे मुलगा (मुलगे) किंवा मुलगी (मुली) राहिले असतील, तर असे मुलगा (मुलगे) किंवा मुलगी (मुली) (सर्व मिळून एक युनिट) प्रकल्पग्रस्त व्यक्ती म्हणून गणले जातील.

क) उपरोक्त “अ” व “ब” येथील सुचना ज्या प्रकरणी जमीन वाटपाची प्रकरणे पुनर्वसन अधिनियम, १९९९, कलम १६ अन्वये म्हणजेच ६५ टक्के रक्कम भरणा केलेल्या व अद्याप जमीन वाटप प्रलंबित असलेल्या प्रकरणी लागु राहील.

सदर शासन परीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन संकेताक २०२५०६०२१७३५५०८७१९ असा आहे. सदरचे परीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANJAY SHANKARRAO INGLE

Digitally signed by SANJAY SHANKARRAO INGLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=f0d616600e4d2f510d1c8cc19813e070ad282d2275bf6fc132a2dee97f14e0a6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D337930B14433DC62C0154AF2BBC60BB5A6EDCAA66B7F34596C50A27EB0F6333, cn=SANJAY SHANKARRAO INGLE
Date: 2025.06.02 17:36:49 +05'30'

**(संजय इंगळे)**
**सह सचिव, महसूल व वन विभाग**

प्रत:-

१. मा. मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. मा. अ.मु.स (मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहायक मंत्रालय,मुंबई
४. सर्व विभागीय आयुक्त
५. सर्व जिल्हाधिकारी
६. सह सचिव (पुनर्वसन) महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. निवडनस्ती कार्यासन र-१, महसुल व विभाग, मंत्रालय, मुंबई ३२